**औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवरील श्री.दे.भ.गोरे, अपर संचालक यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र. औसुवआ-०१२३/प्र.क्र.७/कामगार-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ जून, २०२३

वाचाः- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, क्र.संकीर्ण-१२१४/प्र.क्र.७४/ कामगार-१, दि.०५.०२.२०१५.

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व कलम ४ (५) मधील तरतूदीनुसार खाली नमूद केलेल्या, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अपर संचालक, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने बदली करण्यात येत असून त्यांना खालीलप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र | अधिकाऱ्याचे नाव | कार्यरत पद | बदली नंतर पदस्थापनेचे पद व ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.दे.भ.गोरे | अपर संचालक, नागपूर | अपर संचालक, मुंबई (श्री.मु.र.पाटील, अपर संचालक, मुंबई यांच्या सेवानिवृत्तीमुळे रिक्त झालेल्या पदी) |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. संचालक (अ.का.), औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांनी, श्री.दे.भ.गोरे, अपर संचालक यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करुन, त्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी हजर होण्याच्या सूचना द्याव्यात व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. कार्यालय प्रमुखाने कार्यमुक्त केल्यावर श्री.दे.भ.गोरे, अपर संचालक यांनी तातडीने बदलीच्या ठिकाणी रुजू व्हावे.

३. सदर आदेश निर्गमित केल्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"** (dies non) **म्हणून**

**गणला जाईल.** तसेच त्यांनी अनधिकृतपणे गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेचा खंड पडण्याची शक्यतादेखील नाकारता येत नाही, याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

४. बदली अधिनियमानुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने पारीत केलेल्या आदेशाचे पालन न करणे ही बाब गंभीर स्वरूपाची असून यामुळे पालन न करणारा अधिकारी/ कर्मचारी, विभागीय चौकशी नियमपुस्तिका १९९१ च्या प्रकरण-२ मधील कलम २.१(२)(पाच) अन्वये निलंबनाच्या कार्यवाहीस पात्र ठरेल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

६. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व कलम ४ (५) मधील तरतूदीन्वये व सदर अधिनियमाच्या कलम ६ खालील परंतुक २ व कलम ७ एकत्रित विचारात घेऊन, संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये, सक्षम प्राधिकारी यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२३०६२२१८३७२१५९१० असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2023.06.22 18:38:31 +05'30'

**( दिपक पोकळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, ५ वा मजला, कामगार भवन, ब्लॉक-ई, सी-२०, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई.

**प्रत,**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. श्री.दे.भ.गोरे, अपर संचालक, नागपूर (संचालक (अ.का.), औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांचेमार्फत)
४. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुदेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. उप सचिव (कामगार-१)/ अवर सचिव (कामगार-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. निवड नस्ती (कामगार-१).